(२)

**प्रशासकीय मान्यता -**
**राहता जिल्हा अहमदनगर येथे न्यायालयाची इमारत बांधण्याबाबत.**

2

**महाराष्ट्र शासन**
विधि व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.:-सीसीबी १००९/५७२/प्र.क्र.७२/का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २८जानेवारी, २०१०.

पहा :-१) प्रवंधक(निरीक्षणे-२) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु)६०५९/१९९८, दि.२१/११/२००९.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांचे पत्र क्र.एचकेडब्ल्यु/बीएलडी-७७६८/२००९, दि.१/१०/२००९.

शासन निर्णय :- राहता, जिल्हा अहमदनगर, येथे न्यायालयाची इमारत बांधण्याच्या रु.३,३०,५०,७९७/- (रुपये तीन कोटी तीस लक्ष पन्नास हजार सातशे सत्त्याणव फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अनु.क्र. | कामाचा तपशिल | रक्कम (रूपये) |
|---|---|---|
| १ | इमारतीच्या बांधकामाचा खर्च. | २,५०,९३,९२५/- |
| २ | ४ % आकस्मिक खर्च | ८,५९,६३२/- |
| ३ | ११ % विद्युतीकरण (इमारतीच्या भागापुरते) | २३,६३,९८८/- |
| ४ | फर्निचर | २३,६३,९८८/- |
| ५ | भू विकास | ३,००,०००/- |
| ६ | वॉटर हार्वेस्टींग | १,५०,०००/- |
| ७ | पाणी पुरवठा व मल निस्सारण | १७,१९,२६४/- |
| ८ | अग्निशमन सुविधा | २,००,०००/- |
| | एकूण-- | ३,३०,५०,७९७/- |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-
(अ) प्रस्तुत इमारतीचे काम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मंजूर करुन घेतल्यावरच सुरु करावे.
(ब) जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करुन घेऊनच काम सुरु करावे.
(क) अंतर्गत रस्ते, संरक्षक भिंत इ. ची मापे विस्तृत अंदाजपत्रक करतेवेळी छेद नकाशासह अंतर्भूत करण्यात यावी.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च " मागणी क्र. एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१- कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम (०३) न्यायदान-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरूवात करू नये.**

**कृ.मा.प.**

Rahata.lwpE:\d olddata\DESK-13\Desk.13\Ahmednagar

४.     हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक :३८०/इमा-२,दि. १६.१२.२००९ आणि वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.चक्र.७०/२००८/विनियम, दिनांक-१५/५/२००९ च्या सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-१ तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(मु. ध. अंबादे)
उप सचिव (सेवा)

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक, (निरीक्षणे -२) उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-एक, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
वित्त विभाग (व्यय-६),मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२/अर्थ-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,संगमनेर,
(नकाशे व अंदाजखर्चाच्या प्रतीसह )
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधनिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,मुंबई--४०० ०३२,
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, लोणी,
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
उप कोषागार अधिकारी, अहमदनगर
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
निवड नस्ती.

Rahata.lwpE:\d olddata\DESK-13\Desk.13\Ahmednagar